केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानातील आदिवासी उपयोजनेकरीता (TSP) सन २०२१-२२ व सन २०२२-२३ करीता Infrastructure & Maintenance साठी व सन २०१४-१५ ते सन २०२२-२३ करीता Kind Grant साठी प्रलंबित तसेच चालू आर्थिक वर्षातील ४० टक्के राज्य हिश्श्यापोटी २२१०E४५५ या लेखाशिर्षाखाली रु.१३९०९.७७ लक्ष अनुदान सन २०२२-२३ च्या सुधारीत अंदाज तरतुदीतून वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-३५२२/प्र.क्र.५१/२२/आरोग्य-७**

१० वा मजला , गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत

नवीन मंत्रालय, मुंबई ४०००01.

दिनांक : २८ मार्च, २०२३

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२, दिनांक ०८.०२.२०२३,दि.१२.०१.२०२३ व दि.१६.०३.२०२३

२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/कें.रा.हि./५९३४-४१/२०२२-२३, दिनांक ११.०४.२०२२

३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/रा.हि./७९७५०-५७/२०२२-२३, दिनांक २६.०६.२०२२

४) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/Kind रा.हि./१००३२-३९/२०२२-२३, दिनांक २१.०४.२०२२.

५) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/Kind रा.हि./१३०५०४/२०२२-२३, दिनांक १४.११.२०२२.

६) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/Kind रा.हि./१३८१३९/२०२२-२३, दिनांक २०.०१.२०२३.

७) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ रा.हि./१४७३९९/२०२२-२३, दिनांक १४.०२.२०२३.

८) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.०५/कार्यासन-६, दिनांक २३.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता आदिवासी उपयोजनेसाठी (TSP) सन २०२२-२३ च्या सुधारीत अंदाजातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून मागील प्रलंबित व चालू आर्थिक वर्षातील Infrastructure & Maintenance व Kind Grant मागील प्रलंबित सन २०१४-१५ ते सन २०२१-२२ तसेच चालू आर्थिक वर्षातील राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता आदिवासी उपयोजनेतून (TSP) राज्य हिस्सा वितरीत करण्याकरिता सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात राज्य हिस्सा २२१०E४५५ या लेखाशिर्षाखाली रु.३२३५५.८० लक्ष एवढी तरतुद सुधारीत अंदाजानुसार अर्थसंकल्पित केलेली आहे. सबब, सदर तरतुदीतून मागील वर्षातील प्रलंबित असलेले ४०% राज्य हिश्श्यातील रु.१००००.०० लक्ष इतकी रक्कम वितरीत झाली असून आता उर्वरीत रु.२२३५५.८० लक्ष इतकी तरतूदीतून रु.१३९०९.७७ लक्ष इतका राज्य हिस्सा वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त,

आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाजानूसार उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

(रु.लाखात)

| अ. क्र. | तपशील | लेखाशिर्ष | सन २०२२-२३ साठी सुधारीत अंदाज | वितरीत करावयाची तरतुद |
|---|---|---|---|---|
| १ | आदिवासी विकास विभाग मागणी क्र.टी-५, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६ सार्वजनिक आरोग्य, ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) (१६) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान - राज्य आरोग्य संस्थांना सहायक अनुदान (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०E४५५ | ३२३५५.८० | १३९०९.७७ |

४. वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

८. सदर अनुदान सशर्त असून यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय, आदिवासी विकास विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०१/का-६, दिनांक २३.०३.२०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६३/२०२३/व्यय-१४, दिनांक १३.०३.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११८१५५४६११७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY DHONDU DAGALE

Digitally signed by SANJAY DHONDU DAGALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=91c5ac1bc356eb88dac279997c206f0bc13ac253742cc3f97488b07c83657b5f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02E1EAC848EB66AA47BB931E6668D24F8AEF7B3F3FA0341F35962CC85B518C62, cn=SANJAY DHONDU DAGALE
Date: 2023.03.28 17:29:38 +05'30'

**(सजंय डगळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणॆ .
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग/ अर्थसंकल्प व व्यय-१४ कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग/ कार्यासन-६, मंत्रालय, मुंबई.
११. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१२. निवडनस्ती ( आरोग्य -७) .